**स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या राज्य अभियान संचालनालयातील राज्य अभियान संचालकांचे वेतन व भत्ते अदा करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष (योजनेतर) सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्वमअ-२०१५/प्र.क्र.११६/नवि-३४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई

दिनांक: ०६ जुलै, २०१५

वाचा

१) शासन निर्णय क्र.: स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४ दिनांक २४ एप्रिल २०१५

२) शासन निर्णय क्र.: स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४ दिनांक १५ मे २०१५

**प्रस्तावना**

स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) च्या अंमलबजावणीस संदर्भीय क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर अभियानाच्या अंमलबजावणीसाठी संदर्भीय क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये नगर विकास विभागाच्या अंतर्गत अभियान संचालनालयाची निर्मिती करण्यात आलेली आहे तसेच सदर अभियान संचालनालयात राज्य अभियान संचालकाची नियुक्ती करण्यात आली आहे. राज्य अभियान संचालकांचे वेतन व भत्ते याची तरतूद करून ते अदा करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

स्वच्छ महाराष्ट्र अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी नगर विकास विभागाच्या अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या राज्य अभियान संचालनालयातील राज्य अभियान संचालकांचे वेतन व भत्ते याची तरतूद करून ते अदा करण्यासाठी पुढीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्र. एफ- २

मुख्य लेखाशीर्ष- २२१७, नगरविकास

(८०) सर्वसाधारण

००१, संचालन व प्रशासन

०१, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)

(०१) (०१) स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत राज्य अभियान संचालकाचे वेतन व भत्ते (योजनेतर) (२२१७ ९८४१)

०१. वेतन

०६. दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क

११. देशांतर्गत प्रवास खर्च

१२.विदेश प्रवास

१३. कार्यालयीन खर्च

१४. भाडेपट्टी

१७. संगणक खर्च

**०२.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२२/अर्थ-१६ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून तसेच महालेखापाल, मुंबई यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०६१६१११९८३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.07.06 16:16:34 +05'30'

**( सुधाकर ज्ञा. बोबडे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

७) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

८) महालेखापाल-१, लेखापरीक्षा

९) महालेखापाल-२, लेखापरीक्षा

१०) महालेखापाल-१, लेखा व अनुज्ञेयता

११) महालेखापाल-२, लेखा व अनुज्ञेयता

१२) विभागीय आयुक्त, सर्व

१३) जिल्हाधिकारी, सर्व

१४) आयुक्त, महानगरपालिका, सर्व

१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१६) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान, मुंबई.

१७) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद/नगरपंचायती.

१८) सह सचिव (नवि-४)

१९) निवड नस्ती (नवि-३४)